राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान अंतर्गत आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रामध्ये (AAM-UHWC) जन आरोग्य समितीची स्थापना करुन कार्यान्वित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्र.एनएचएम-११२४/ प्र.क्र ४४७ / आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकूल इमारत,

नवीन मंत्रालय, मुंबई -४००००१

दिनांक - १८.०२.२०२५

**संदर्भ:-**

१. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, एनएचएन-११२२/प्र.क.५४/आरोग्य-७, दि. २३.११.२०२२
२. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, नाआअ-२०१५/प्र.क्र.३०/ आरोग्य-७ अ, दि.२६.०८.२०१५
३. केंद्र शासनाचे जन आरोग्य समिती स्थापन करण्याबाबतच्या मार्गदर्शक पुस्तिका सन २०२०
४. संचालक (NHM-II ), भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र NHSRC/११-१२/CP ०८/MOHFW/P,F-६१, दि. २१/०७/२०२२
५. सहसंचालक, तांत्रिक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे प्रस्ताव क्र.राआसोम/रु.क.स.कक्ष/ना.जन.आ.स./मार्गदर्शीका/५९००४-००५/२४, दिनांक २६/०८/२०२४

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनामार्फत राज्यात आरोग्य सेवांमधील समस्यांचे निराकरण करण्यासाठी आयुष्मान भारत योजनेंतर्गत नागरी प्राथमिक आरोग्य केंद्राचे (UPHC) रुपांतर आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्रात (AAM-UPHC) केले असुन नागरी भागात नव्याने आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्र (AAM-UHWC) सुध्दा स्थापीत केलेले आहे. आयुष्मान आरोग्य मंदिराच्या कार्यक्षेत्रातील लोकांना वेगवेगळया प्रकारच्या प्रतिबंधात्मक, प्रसारक, उपचारात्मक, पुनर्वसनात्मक आणि उपशामक/वृध्दापकालीन काळजी (Palliative Care) आरोग्य सेवा प्रदान करण्याचे प्रथम संपर्क ठिकाण बनविणे अपेक्षित आहे. आयुष्मान आरोग्य मंदिरामार्फत आरोग्य सेवा देण्याची महत्वपुर्ण भुमिका बजावणे आणि आरोग्यावर परिणाम करणा-या सामाजिक व पर्यावरणात्मक घटक यांच्यासाठी एकत्रित सामुदायिक कृतीवर लक्ष केंद्रीत करणे, सामाजिक जबाबदारी व सामुहिक प्रतिसादाच्या प्रक्रियेस सहाय्य करणे हे अपेक्षित आहे.

राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत कार्यरत नागरी प्राथमिक आरोग्य केंद्रस्तरावर सदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये रुग्ण कल्याण समिती कार्यरत आहे. आयुष्मान भारत योजनेतंर्गत रुपांतरीत

आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) स्तरावरील कार्यरत रुग्ण कल्याण समितीच्या नावात बदल करुन जन आरोग्य समिती असे करण्याबाबत तसेच नव्याने स्थापीत आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावर (AAM-UHWC) सुध्दा जन आरोग्य समिती स्थापन करुन कार्यान्वित करण्याबाबत संदर्भ क्र. ३ व ४ अन्वये केंद्र शासनाकडुन मार्गदर्शक सुचना प्राप्त झाल्या आहेत.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार राज्यातील नागरी आरोग्य सेवांमधील समस्यांचे निराकरण करण्यासाठी व गुणवत्तापुर्ण आरोग्य सेवा देण्यासाठी आयुष्मान भारत योजनेतंर्गत आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्र (AAM-UHWC) अनुक्रमे रुपांतरीत व स्थापित करण्यात आलेले आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) स्तरावरील रुग्ण कल्याण समितीच्या नावात बदल करुन जन आरोग्य समिती असे करण्याबाबत तसेच ज्या आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्रात (AAM-UPHC) अदयापपर्यंत रुग्ण कल्याण समिती स्थापीत करण्यात आलेली नाही अशा ठिकाणी व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावर (AAM-UHWC) जन आरोग्य समिती स्थापन करण्याबाबत सदर पत्राच्या अनुषंगाने कळविण्यात येत आहे.

**आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्र (AAM-UHWC) स्तरावरील जन आरोग्य समितीची रचना व कार्यपध्दती खालील प्रमाणे.**

१) **जन आरोग्य समितीचे उद्दिष्टे :-**

१. आरोग्य सेवा सुविधांचे प्रशासकिय व्यवस्थापन व जबाबदा-या, सामाजिक उत्तरदायित्व आणि समुदायाचा सहभाग वाढविणे करीता संस्थात्मक व्यासपीठ निर्माण करणे.
२. उपलब्ध अबंधित निधीचा (Untied Grants) योग्य वापर व त्यांचे व्यवस्थापन करणे तसेच आरोग्य यंत्रणेसोबत समन्वय साधण्यास एक छत्र म्हणून कार्य करणे.
३. समूदाय स्तरावरील विविध वयोगटातील रुग्णांस उपचार व प्रयोगशालेय चाचण्याच्या सोयीसाठी पाठपुरावा करणे व त्यास प्रोत्साहन देणे.
४. समूदाय स्तरावर विविधोपचार, पाठपुरावा, सर्व्हेक्षण इ. साठी कार्यक्षेत्रातील संघटित स्वंयसेवक (NSS, NCC, RED CROSS, SCOUTS, YUVA Group) यांचा सहभाग निश्चित करणे.
५. आयुष्मान आरोग्य मंदिर स्तरावर दाखल होणा-या कुटूंबांना दर्जेदार आरोग्य सेवा उपलब्धता आणि जबाबदारी सुनिश्चित करणेसाठी तक्रार निवारणासाठी एक व्यासपीठ म्हणून कार्य करणे.
६. शहरी भागात आरोग्य सेवेचा दर्जा उंचावणेसाठी विविध शासकिय आरोग्य विषयक योजना, सी.एस.आर आणि धर्मादाय संस्था यांच्याकडून देणगी व्दारे निधी न स्वीकारता वस्तुस्वरुपात साहित्य प्राप्त करुन घेण्यात यावे.
७. आरोग्य विषयक सुविधेसाठी नियोजन हाती घेण्यास महानगरपालीका, नगरपालीका आणि कटकमंडळाचा सक्रिय पाठिंबा मिळवणे.

**बृहन्मुंबई महानगरपालीका, इतर महानगरपालीका, नगरपालीका व कटकमंडळ कार्यक्षेत्रातील आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावर (AAM-UHWC) गठीत केलेल्या जन आरोग्य समितीची रचना खालील प्रमाणे.**

**२) बृहन्मुंबई महानगरपालिका कार्यक्षेत्रातील आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावर (AAM-UHWC) गठीत केलेल्या जन आरोग्य समितीची रचना.**

| अ.क्र. | पद | समिती | |
|---|---|---|---|
| १. | **अध्यक्ष / चेअरमन -** | AAM-UPHC/ AAM-UHWC कार्यक्षेत्रातील प्रतिनिधित्व करणारा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा वॉर्ड सदस्य/नगरसेवक. (कार्यक्षेत्राच्या ठिकाणी एका पेक्षा अधिक नगरसेवक उपलब्ध असल्यास सेवा जेष्ठता हा नियम लागू करावा. तसेच एकापेक्षा अधिक वॉर्ड सदस्य / नगरसेवक असल्यास अध्यक्ष म्हणून त्यांची आळीपाळीने (Rotation) निवड करण्यात यावी. पहिल्या दोन वर्षासाठी नागरी आरोग्य संस्था कार्यरत असलेल्या कार्यक्षेत्राच्या ठिकाणी असलेले वॉर्ड सदस्य / नगरसेवक यांची निवड समितीचे अध्यक्ष म्हणून करावी.) | |
| **२.** | **सह अध्यक्ष-** | सहायक आरोग्य अधिकारी, (Zone)/ वरिष्ठ वैदयकिय अधिकारी (Ward) बृहमुंबई महानगरपालिका | |
| ३. | **सदस्य सचिव-** | **आयुष्मान** आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व **आयुष्मान** आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावरील (AAM-UHWC) वैद्यकिय अधिकारी. | |
| ४. | **पदसिद्ध सदस्य-** | **क.** | स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेच्या आरोग्य उपसमितीचे अध्यक्ष. |
| | | **ख.** | AAM-UPHC/ AAM -UHWC कार्यक्षेत्रातील वॉर्ड सदस्य / नगरसेवक स्थानिक स्वराज्य संस्थेच्या कार्यक्षेत्राच्या ठिकाणी एका पेक्षा अधिक नगरसेवक असलेले. |
| | | **ग.** | नागरी कार्यक्षेत्रातील महिला व बाल कल्याण (DWCD) विभागाचे क्षेत्रिय पर्यवेक्षक. |
| | | **घ.** | सार्वजनिक आरोग्य अभियांत्रिकी (PHED) /स्वच्छ भारत मिशन अंतर्गत स्वच्छतेसाठी जबाबदार विभागाचा एक प्रतिनिधी/ सॅनिटरी इन्स्पेक्टर. |
| | | **ड..** | सार्वजनिक आरोग्य अभियांत्रिकी (PHED) /स्वच्छ भारत मिशन अंतर्गत पाण्यासाठी जबाबदार विभागाचा एक प्रतिनिधी. |
| | | **च.** | ULB मधील आरोग्य/ सार्वजनिक आरोग्य विभागाचा एक प्रतिनिधी |
| | | **छ.** | कार्यक्षेत्रातील शिक्षण विभाग/ शाळेचे मुख्याध्यापक. ( परिसरात सरकारी शाळा उपलब्ध नसल्यास खाजगी शाळेच्या प्रतिनिधीची निवड करता येईल.) |
| | | **ज.** | नेहरू युवा केंद्र (NYK) /युवा स्वयंसेवक कार्यक्रमाचे व्यवस्थापन करणाऱ्या विभाग/एजन्सीचा एक प्रतिनिधी. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | झ. | दिनदयाल योजना NULM अतर्गत शहरी दारिद्रये निर्मुलन कार्यक्रमाचे व्यवस्थापन करणारा विभाग/ एजन्सीचा प्रतिनिधी. |
| | | त्र. | अन्य वैद्यकिय अधिकारी, संबधित AAM-UPHC / AAM -UHWC |
| | | ट. | वरीष्ठ स्टाफ नर्स/ एल.एच.व्ही. |
| | | ठ. | कार्यक्षेत्रातील एकूण २ महिला आरोग्य समितीचे अध्यक्ष. ( कार्यक्षेत्रात एका पेक्षा अधिक MAS असल्यास २ वर्षासाठी आळीपाळीने (Rotation) निवड करावी.) |
| | | ड. | कार्यक्षेत्रातील एकूण २ महिला आरोग्य समितीचे सदस्य सचिव /आशा कार्यकर्ती. ( जास्तीत जास्त ५ महिला आरोग्य समितीचे सदस्य सचिवाची निवड करावी.) |
| | | ढ. | सर्व आरोग्य सेवक / आरोग्य सेविका |
| | | ण. | नोंदणीकृत निवासी कल्याण संघटनेचे एक प्रतिनिधी. ( जर त्या भागात नोंदणीकृत निवासी कल्याण संघटनेचे फेडरेशन असल्यास त्यांचा एका प्रतिनिधीची निवड करावी.) |
| ५. | **सर्व साधारण सदस्य-** | १. | कार्यक्षेत्रात सक्रिय २ स्वंय सहाय्यता गटातील (महिला) अध्यक्षा. ( दोन पेक्षा अधिक गट कार्यरत असल्यास किमान ३ वर्षासाठी आळीपाळीने (Rotation) पध्दतीने निवड करावी. |
| | | २. | उपजिवीका गट- शहरी भागतील गरीब कल्याण कार्यक्रम अंतर्गत समूदाय स्तरावरील २ गटाचे अध्यक्ष. ( दोन पेक्षा अधिक गट कार्यरत असल्यास किमान २ वर्षासाठी आळीपाळीने (Rotation) पध्दतीने निवड करावी. |
| | | ३. | शालेय आरोग्य दूत / आयुष्मान भारत योजनेतील कार्यरत शालेय आरोग्य व कल्याण दूतापैकी एक प्रतिनिधी. ( सर्वाधिक पट नोंदणी असलेल्या शाळेचा एक प्रतिनिधी ) |
| | | ४. | शहरी भागातील २ प्रतिष्ठित नागरीक. |
| | | ५. | इतर विभागाचे/कार्यक्रमाचे किमान २ प्रतिनिधी. ज्याचा स्थानिक संदर्भानुसार आरोग्य किंवा त्यांच्या निर्धारकांशी जवळचा संबंध असणारे. |
| ६. | विशेष निमंत्रित सदस्य - | क्षयरोग मुक्त, कर्करोगावर यशस्वी मात केलेला, तृतीयपंथी, अपंग व्यक्ती आणि तरुण प्रतिनिधी, कोणताही असा पुरुष ज्यांनी एक अथवा दोन मुलांमध्ये नसबंदी केली आहे. | |

**३) इतर महानगरपालिका कार्यक्षेत्रातील आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावर (AAM-UHWC) गठीत केलेल्या जन आरोग्य समितीची रचना.**

| अ.क्र. | पद | समिती | |
|---|---|---|---|
| १. | अध्यक्ष / चेअरमन - | AAM-UPHC/ AAM-UHWC कार्यक्षेत्रातील प्रतिनिधित्व करणारा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा वॉर्ड सदस्य / नगरसेवक. (कार्यक्षेत्राच्या ठिकाणी एका पेक्षा अधिक नगरसेवक उपलब्ध असल्यास सेवा जेष्ठता हा नियम लागू करावा. तसेच एकापेक्षा अधिक वॉर्ड सदस्य / नगरसेवक असल्यास अध्यक्ष म्हणून त्यांची आळीपाळीने (Rotation) निवड करण्यात यावी . पहिल्या दोन वर्षासाठी नागरी आरोग्य संस्था कार्यरत असलेल्या कार्यक्षेत्राच्या ठिकाणी असलेले वॉर्ड सदस्य / नगरसेवक यांची निवड समितीचे अध्यक्ष म्हणून निवड करावी. | |
| २. | सह अध्यक्ष- | सहायक वैद्यकिय आरोग्य अधिकारी किंवा समश्रेणी दर्जाचे वैद्यकिय अधिकारी संबधित महानगरपालीका. | |
| ३. | सदस्य सचिव- | आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावरील (AAM-UHWC) वैद्यकिय अधिकारी. | |
| ४. | पदसिद्ध सदस्य- | क. | स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेच्या आरोग्य उपसमितीचे अध्यक्ष. |
| | | ख. | AAM-UPHC / AAM-UHWC कार्यक्षेत्रातील वॉर्ड सदस्य / नगरसेवक स्थानिक स्वराज्य संस्थेच्या कार्यक्षेत्राच्या ठिकाणी एका पेक्षा अधिक नगरसेवक असलेले. |
| | | ग. | नागरी कार्यक्षेत्रातील महिला व बाल कल्याण (DWCD) विभागाचे क्षेत्रिय पर्यवेक्षक. |
| | | घ. | सार्वजनिक आरोग्य अभियांत्रिकी (PHED) /स्वच्छ भारत मिशन अंतर्गत स्वच्छतेसाठी जबाबदार विभागाचा एक प्रतिनिधी/ सॅनिटरी इन्स्पेक्टर. |
| | | ङ.. | सार्वजनिक आरोग्य अभियांत्रिकी (PHED) /स्वच्छ भारत मिशन अंतर्गत पाण्यासाठी जबाबदार विभागाचा एक प्रतिनिधी. |
| | | च. | ULB मधील आरोग्य/ सार्वजनिक आरोग्य विभागाचा एक प्रतिनिधी |
| | | छ. | कार्यक्षेत्रातील शिक्षण विभाग/ शाळेचे मुख्याध्यापक. ( परिसरात सरकारी शाळा उपलब्ध नसल्यास खाजगी शाळेच्या प्रतिनिधीची निवड करता येईल) |
| | | ज. | नेहरू युवा केंद्र (NYK) /युवा स्वयंसेवक कार्यक्रमाचे व्यवस्थापन करणाऱ्या विभाग/एजन्सीचा एक प्रतिनिधी. |
| | | झ. | दीनदयाल योजना NULM अंतर्गत शहरी दारिद्रये निर्मुलन कार्यक्रमाचे व्यवस्थापन करणारा विभाग/ एजन्सीचा प्रतिनिधी. |
| | | त्र. | अन्य वैद्यकिय अधिकारी, संबधित AAM-UPHC /AAM-UHWC |
| | | ट. | वरीष्ठ स्टाफ नर्स / एल.एच.व्ही. |
| | | ठ. | कार्यक्षेत्रातील एकूण २ महिला आरोग्य समितीचे अध्यक्ष. ( कार्यक्षेत्रात एका पेक्षा अधिक MAS असल्यास २ वर्षासाठी आळीपाळीने (Rotation) निवड करावी.) |

| | | | |
|---|---|---|---|
| | | ड. | कार्यक्षेत्रातील एकूण २ महिला आरोग्य समितीचे सदस्य सचिव / आशा कार्यकर्ती. ( जास्तीत जास्त ५ महिला आरोग्य समितीचे सदस्य सचिवांची निवड करावी.) |
| | | ढ. | सर्व आरोग्य सेवक / आरोग्य सेविका |
| | | ण. | नोंदणीकृत निवासी कल्याण संघटनेचे एक प्रतिनिधी. ( जर त्या भागात नोंदणीकृत निवासी कल्याण संघटनेचे फेडरेशन असल्यास त्यांचा एका प्रतिनिधीची निवड करावी.) |
| ५. | **सर्व साधारण सदस्य-** | १. | कार्यक्षेत्रात सक्रिय २ स्वंय सहाय्यता गटातील (महिला) अध्यक्ष. (दोन पेक्षा अधिक गट कार्यरत असल्यास किमान ३ वर्षासाठी आळीपाळीने (Rotation) पध्दतीने निवड करावी. ) |
| | | २. | उपजिवीका गट - शहरी भागातील गरीब कल्याण कार्यक्रम अंतर्गत समूदाय स्तरावरील २ गटाचे अध्यक्ष. ( दोन पेक्षा अधिक गट कार्यरत असल्यास किमान २ वर्षासाठी आळीपाळीने (Rotation) पध्दतीने निवड करावी. ) |
| | | ३. | शालेय आरोग्य दूत / आयुष्मान भारत योजनेतील कार्यरत शालेय आरोग्य व कल्याण दूतापैकी एक प्रतिनिधी. ( सर्वाधिक पट नोंदणी असलेल्या शाळेचा एक प्रतिनिधी. ) |
| | | ४. | शहरी भागातील २ प्रतिष्ठित नागरीक. |
| | | ५. | इतर विभागाचे/कार्यक्रमाचे किमान २ प्रतिनिधी ज्याचा स्थानिक संदर्भानुसार आरोग्य किंवा त्यांच्या निर्धारकांशी जवळचा संबंध आहे. |
| ६. | विशेष निमंत्रित सदस्य - | क्षयरोग मुक्त, कर्करोगावर यशस्वी मात केलेला, तृतीयपंथी, अपंग व्यक्ती आणि तरुण प्रतिनिधी, कोणताही असा पुरुष ज्यांनी एक अथवा दोन मुलांमध्ये नसबंदी केली आहे. | |

**४) नगरपालिका व कटकमंडळ कार्यक्षेत्रातील आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावर (AAM-UHWC) गठीत केलेल्या जन आरोग्य समितीची रचना.**

| | | |
|---|---|---|
| १. | **अध्यक्ष / चेअरमन -** | AAM-UPHC/ AAM-UHWC कार्यक्षेत्रातील प्रतिनिधित्व करणारा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा वॉर्ड सदस्य / नगरसेवक. (कार्यक्षेत्राच्या ठिकाणी एका पेक्षा अधिक नगरसेवक उपलब्ध असल्यास सेवा जेष्ठता हा नियम लागू करावा. तसेच एकापेक्षा अधिक वॉर्ड सदस्य / नगरसेवक असल्यास अध्यक्ष म्हणून त्यांची आळीपाळीने (Rotation) निवड करण्यात यावी . पहिल्या दोन वर्षासाठी नागरी आरोग्य संस्था कार्यरत असलेल्या कार्यक्षेत्राच्या ठिकाणी असलेले वॉर्ड सदस्य / नगरसेवक यांची निवड समितीचे अध्यक्ष म्हणून करावी. |
| २. | **सह अध्यक्ष-** | तालुका आरोग्य अधिकारी, संबधित नगरपालीका कार्यक्षेत्र / निवासी वैदयकिय अधिकारी, कटकमंडळे किंवा तत्सम श्रेणी दर्जाचे वैद्यकिय अधिकारी, कटकमंडळे |

| | | | |
|---|---|---|---|
| ३. | **सदस्य सचिव-** | आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावरील (AAM-UHWC) वैद्यकिय अधिकारी. | |
| ४. | **पदसिद्ध सदस्य-** | **क.** | स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेच्या आरोग्य उपसमितीचे अध्यक्ष. |
| | | **ख.** | AAM-UPHC/ AAM-UHWC कार्यक्षेत्रातील वॉर्ड सदस्य / नगरसेवक स्थानिक स्वराज्य संस्थेच्या कार्यक्षेत्राच्या ठिकाणी एका पेक्षा अधिक नगरसेवक असलेले. |
| | | **ग.** | नागरी कार्यक्षेत्रातील महिला व बाल कल्याण (DWCD) विभागाचे क्षेत्रिय पर्यवेक्षक. |
| | | **घ.** | सार्वजनिक आरोग्य अभियांत्रिकी (PHED) /स्वच्छ भारत मिशन अंतर्गत स्वच्छतेसाठी जबाबदार विभागाचा एक प्रतिनिधी/ सॅनिटरी इनस्पेक्टर. |
| | | **ड.** | सार्वजनिक आरोग्य अभियांत्रिकी (PHED) /स्वच्छ भारत मिशन अंतर्गत पाण्यासाठी जबाबदार विभागाचा एक प्रतिनिधी. |
| | | **च.** | ULB मधील आरोग्य/ सार्वजनिक आरोग्य विभागाचा एक प्रतिनिधी |
| | | **छ.** | कार्यक्षेत्रातील शिक्षण विभाग/ शाळेचे मुख्याध्यापक. (परिसरात सरकारी शाळा उपलब्ध नसल्यास खाजगी शाळेच्या प्रतिनिधीची निवड करता येईल) |
| | | **ज.** | नेहरू युवा केंद्र (NYK) /युवा स्वयंसेवक कार्यक्रमाचे व्यवस्थापन करणाऱ्या विभाग / एजन्सीचा एक प्रतिनिधी. |
| | | **झ.** | दीनदयाल योजना NULM अंतर्गत शहरी दारिद्रये निर्मुलन कार्यक्रमाचे व्यवस्थापन करणारा विभाग/ एजन्सीचा प्रतिनिधी. |
| | | **त्र.** | अन्य वैद्यकिय अधिकारी, संबधित AAM-UPHC/ AAM-UHWC |
| | | **ट.** | वरीष्ठ स्टाफ नर्स / एल.एच.व्ही. |
| | | **ठ.** | कार्यक्षेत्रातील एकूण २ महिला आरोग्य समितीचे अध्यक्ष. (कार्यक्षेत्रात एका पेक्षा अधिक MAS असल्यास २ वर्षासाठी आळीपाळीने (Rotation) निवड करावी.) |
| | | **ड.** | कार्यक्षेत्रातील एकूण २ महिला आरोग्य समितीचे सदस्य सचिव/आशा कार्यकर्ती. (जास्तीत जास्त ५ महिला आरोग्य समितीचे सदस्य सचिवाची निवड करावी.) |
| | | **ढ.** | सर्व आरोग्य सेवक / आरोग्य सेविका |
| | | **ण.** | नोंदणीकृत निवासी कल्याण संघटनेचे एक प्रतिनिधी. (जर त्या भागात नोंदणीकृत निवासी कल्याण संघटनेचे फेडरेशन असल्यास त्यांचा एका प्रतिनिधीची निवड करावी.) |
| ५. | **सर्व साधारण सदस्य-** | १. | कार्यक्षेत्रात सक्रिय २ स्वंय सहाय्यता गटातील (महिला) अध्यक्षा. (दोन पेक्षा अधिक गट कार्यरत असल्यास किमान ३ वर्षासाठी आळीपाळीने (Rotation) पध्दतीने निवड करावी. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | २. | उपजिवीका गट- शहरी भागतील गरीब कल्याण कार्यक्रम अंतर्गत समूदाय स्तरावरील २ गटाचे अध्यक्ष. (दोन पेक्षा अधिक गट कार्यरत असल्यास किमान २ वर्षासाठी आळीपाळीने (Rotation) पध्दतीने निवड करावी. |
| | | ३. | शालेय आरोग्य दूत / आयुष्मान भारत योजनेतील कार्यरत शालेय आरोग्य व कल्याण दूतापैकी एक प्रतिनिधी. (सर्वाधिक पट नोंदणी असलेल्या शाळेचा एक प्रतिनिधी) |
| | | ४. | शहरी भागातील २ प्रतिष्ठित नागरीक. |
| | | ५. | इतर विभागाचे/कार्यक्रमाचे किमान २ प्रतिनिधी ज्याचा स्थानिक संदर्भानुसार आरोग्य किंवा त्यांच्या निर्धाराशी जवळचा संबंध आहे. |
| ६. | विशेष निमंत्रित सदस्य - | क्षयरोग मुक्त, कर्करोगावर यशस्वी मात केलेला, तृतीयपंथी, अपंग व्यक्ती आणि तरुण प्रतिनिधी, कोणताही असा पुरुष ज्यानी एक अथवा दोन मुलांमध्ये नसबंदी केली आहे. | |

**५) वरील आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावरील (AAM-UHWC) समित्यांसाठी सर्वसाधारण सुचना-**

१. सदस्य पदाचा कार्यकाळ हा किमान तीन वर्षाचा असेल. जेणेकरुन सर्व सदस्यांना या समितीचे प्रतिनिधीत्व करता येईल.

२. महानगरपालिकेच्या अधिन येणा-या आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रातील (AAM-UHWC) वैदयकिय अधिकारी यांनी सदस्य सचिव या नात्याने जन आरोग्य समिती सदस्याची निवड करुन त्याबाबतचा प्रस्ताव संबधित महानगरपालीकेच्या शहरी एकात्मिक आरोग्य व कुंटूब कल्याण सोसायटीकडे मान्यतेसाठी सादर करावा.

३. नगरपालीका/कटकमंडळाच्या अधिन येणा-या आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रातील (AAM-UHWC) वैदयकिय अधिकारी यांनी सदस्य सचिव या नात्याने जन आरोग्य समिती सदस्यांची निवड करुन त्याबाबतचा प्रस्ताव संबधित जिल्हा एकात्मिक आरोग्य व कुंटूब कल्याण सोसायटीच्या मान्यतेसाठी सादर करावा.

४. जन आरोग्य समिती सदस्यांच्या निवडीमध्ये आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रस्तरावरील (AAM-UHWC) कार्यक्षेत्रातील सर्व समूदायामधील चांगले प्रतिनिधीत्व करणारे एकुण १/३ (अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती) त्यामध्ये प्रतिनिधीची निवड करावी यामध्ये महिलांना किमान ५०% प्रतिनिधीत्व मिळेल असे पहावे.

५. जन आरोग्य समितीची निर्मिती /रचना/भुमिका सदस्यांच्या फोन नंबर इत्यादी सर्व माहिती आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रच्या (AAM-UHWC) दर्शनी भागात लावण्यात यावे.

६) **जन आरोग्य समितीची भूमिका व जबाबदारी:-**

१. सर्वांसाठी दर्जेदार आरोग्य सेवांची तरतूद आणि जबाबदारी सुनिश्चित करण्यासाठी आयुष्मान भारत आयुष्मान आरोग्य मंदिर केंद्राला मदत, सहाय्य आणि समर्थन देणे.

२. आयुष्मान भारत आयुष्मान आरोग्य मंदिर केद्रांत दिल्या जाणा-या आरोग्य सेवांची यादी सिटीझन चार्टर नुसार आहेत यांची खात्री करणे.

३. आयुष्मान भारत योजनेअंतर्गत आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रामध्ये (AAM-UHWC) दिल्या जाणा-या प्रतिबंधात्मक आणि प्रोत्साहनात्मक आरोग्य सेवा निदर्शनास आणून देणे. जसे की, असंसर्गजन्य रोग, गंभीर आजार, दृष्टी, कान, नाक, इ. सेवा उपलब्ध राहतील. तसेच गर्भवती महिला, स्तनपान देणारी महिला, लहान बालके, किशोरवयीन मुले, आणि योगासत्र कल्याण सारखे शिबिराचे आयोजन केले जाईल यांची खात्री करणे.

४. आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रात (AAM-UHWC) सुरक्षित पिण्याचे पाणी, कचरामुक्त परिसर, स्वच्छ शौचालये, स्वच्छ लिनन, स्वच्छ प्रतिक्षालये, योग्य सुरक्षा व्यवस्था, जैव वैदयकिय कचरा व नियमित कचरा यांची योग्य विल्हेवाटेची आणि देखभालीची व्यवस्था सुनिश्चित करुन घेणे व त्याची दिशादर्शके फलके योग्य ठिकाणी लावली असल्याची खात्री करणे.

५. आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रामध्ये (AAM-UHWC) अत्यावश्यक औषधांची यादी व निदानात्मक यादी याप्रमाणे उपचार मिळतील याची खात्री करणे.

६. आयुष्मान आरोग्य मंदिरात मैत्रीपुर्ण वातावरण व सांस्कृतिक प्रोत्साहन असेल असे पहावे. प्रशिक्षण/ दिशानिर्देश/ संवेदनशीलतेव्दारे सुधारात्मक यंत्रणेस प्रतिसाद असावा.

७. आयुष्मान आरोग्य मंदिर स्तरावर समाजातील गरीब व असुरक्षित घटकांना योग्य आरोग्य सेवा मिळणेसाठी कोणत्याही अडचणीस सामोरे जावे लागू नये व त्यांना त्यांच्या भेटीच्या वेळी सेवा नाकारली जाणार नाहीत याची खात्री करणे.

८. आयुष्मान आरोग्य मंदिर स्तरावर सोशल मिडिया आणि डिजिटल जनसंपर्क वापरास प्रोत्साहित करणे, तसेच गंभिर आजार असलेल्या रुग्णांस आरोग्य सेवा दिली असल्यास सदर रुग्णांची गृह/समुदाय पातळीवरील भेटी देऊन पाठपुरावा करणे.

९. आयुष्मान आरोग्य मंदिर स्तरावर सुविधा निश्चित केलेल्या व गुणवत्ता विषयक मानके परिपुर्ण होण्यासाठी नियमित आढावा घेणे व त्यावर देखरेख करणे.

७) **जन आरोग्य समित्यांची कार्ये:-**

१. सामाजिक आणि पर्यावरणीय निर्धारकांवरील बहु-क्षेत्रिय कार्यक्रमाचे नियोजन आणि त्यास समर्थन करणेसाठी एक व्यासपीठ म्हणून समिती काम करेल.

२. क्षेत्रिय पातळीवर वार्षिक आरोग्य दिनदर्शिका दिवस साजरा करणे.

३. विविध आजारांच्या सनियत्रंणासाठी नियोजित राष्ट्रीय कार्यक्रमाची अंमलबजावणी सामुदायिक पातळीवर करणे.

४. स्थानिक महिला गट/बचत गट/शेतकरी गट/सांस्कृतिक गट/महिला आरोग्य समिती/दूध विक्री संघ आणि इतर संघटनांचा सहभाग घेणे त्यात लिंग समानता, महिलांच्या आरोग्य विषयक समस्या

निवारणास प्रोत्साहन देणे, निरोगी जीवनशैलीचा अवलंब करणे व अंमली पदार्थ सेवनावर प्रतिबंध घालणे.

५. रेडिओ,सोशल मिडिया इत्यादीचा अधिकतम वापर करुन आरोग्य व आर्थिक जोखीमे वरील रक्षणासाठी विविध शासकिय योजने अंतर्गत येणा-या सेवा व हक्क याबद्दल जागरुकता निर्माण करणे.

६. सामाजिक उत्तरदायित्व अनुषंगाने जनतेमार्फत प्राप्त तक्रारीचे निवारण करणेस प्रोत्साहन देणे.

८) **जन आरोग्य समितीच्या बैठकांचे नियोजन: -**

१. जन आरोग्य समितीची दरमहा एक याप्रमाणे वार्षिक १२ वैठका होणे अपेक्षित असुन वार्षिक किमान १० बैठकाचे आयोजन होईल असे पहावे.

२. जन आरोग्य समितीचे सदस्य सचिव हे मासिक बैठकीचे आयोजन करतील. सभेच्या दिवसांची तारीख, वार व वेळ इ. सर्व मान्यवर सदस्यांना प्रारुप अजेंडासह ( लेखी/ तोंडी ) स्वरुपात कळवतील तसेच सभेविषयीची स्पष्ट माहिती प्रत्येक सदस्यांपर्यंत पोहचवली जाईल याची खात्री करतील.

३. सभेसाठी आवश्यक असलेला कोरम संख्या ही ५०% टक्के समिती सदस्यांचा उपस्थितीत असेल. जन आरोग्य समितीची बैठक सुरु करणेसाठी पुरेसा कोरम नसेल तर ती बैठक स्थगित केली जाईल आणि कोरम भरुन काढणेसाठी इतर सदस्यांच्या सोयीच्या वेळानुसार एक सुचना पत्रक काढून बैठक त्याच दिवशी आयोजित करावी. पुन्हा आयोजित केलेल्या बैठकीमध्ये ५० टक्के गणसंख्या नसली तरी कार्यक्रम पत्रिकेनुसार सर्वसाधारणपणे बैठक आयोजित करावी. परंतु, लागोपाठ दोन मासिक बैठकामध्ये आवश्यक कोरम ५० टक्के पेक्षा कमी असल्यास विचारात घेता येणार नाही. गणसंख्येशिवाय दुस-यांदा आयोजित केलेल्या बैठकीमध्ये तातडीच्या गरजा व सामान्य स्वरुपाच्या बाबी यावरच निर्णय व मान्यता ( आधीच्या बैठकीत मान्य केलेल्या धोरणानुसार ) घेण्यात यावी. नवीन उपक्रम किंवा नवीन आर्थिक खर्चाच्या बाबीसाठी धोरणात्मक निर्णय किंवा मान्यता केवळ ५० टक्के आवश्यक कोरम असल्याशिवाय बैठक घेता येणार नाही.

४. जन आरोग्य समिती ही आर्थिक वर्षाच्या शेवटच्या बैठकीत चालू वित्तीय वर्षात केलेल्या कामकाजाचा आणि झालेल्या खर्चाचा लेखा अहवाल/वार्षिक अहवाल सादर करेल.

५. त्यानंतर, पुढील वर्षासाठी कृती आराखडा (नियोजन) तयार केले जाईल यासाठी एक पर्यवेक्षण यंत्रणा म्हणून समिती कार्य करेल.

६. आयुष्मान भारत योजने अंतर्गत आयुष्मान आरोग्य मंदिर स्तरावर मागील वर्षाचा भौतिक व आर्थिक अहवाल पुढील आर्थिक वर्षाच्या माहे एप्रिलमध्ये समितीच्या बैठकीत सादर करुन मंजुरी घेण्यात यावी.

७. दरवर्षी एप्रिल-मे महिन्यात योजना आखण्याचे नियोजन सुचविले पाहिजे जेणेकरुन आरोग्य व स्वच्छता विषयक नियोजनाचे प्रश्न संबंधित महानगरपालीका, नगरपालीका व कटकमंडळाच्या वार्षिक नियोजन प्रक्रियेत सादर करता येतील.

८. प्रत्येक प्रस्तावित उपक्रम आणि त्यावरील खर्चास बैठकीत उपस्थित किमान २/३ इतक्या सदस्यांव्दारे मान्यता घेण्यात यावी. मागील सभेपासून हाती घेण्यात आलेली सर्व कामे व त्यावरील झालेला खर्च सादर करुन बैठकीत मंजुरी घेण्यात यावी. सादर केलेले सर्व प्रस्तावावर उपस्थित सभासंदानी एक मताने किंवा होकार दर्शवून आपली मते नोंदवून मान्यता घ्यावी.

९. जन आरोग्य समितीच्या प्रत्येक सभेच्या इतिवृत्ताची नोंद ठेवली जाईल. मागील महिन्यात झालेल्या उपक्रमाचे लेखांकन, खर्चाचा दस्ताऐवजीकरण केले जाईल.

१०. जन आरोग्य समितीच्या प्रत्येक बैठकीत नियमित विषयसुची व्यतिरिक्त आरोग्य वर्धिनी केंद्रातील इतर विषयाचा संच विषयसुची मध्ये समाविष्ट करुन सादर करणे आवश्यक आहे.

## ९) जन आरोग्य समितीचा अबंधीत निधी (Untied Grants) :-

१. आयुष्मान भारत योजने अंतर्गत आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्रास (AAM-UPHC) रु.१,७५,०००/-व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रास (AAM-UHWC) रु.१,००,००० /- इतका वार्षिक अबंधीत निधीची तरतूद करण्यात येते.

२. अंबधीत निधी हा लवचिक (Flexi pool ) निधी असून समितीच्या पातळीवर घेतलेल्या निर्णयाच्या आधारे अत्यावश्यक गरजा पुर्ण करणेस या निधीचा वापर करता येईल.

३. रूग्णांना व नागरिकांना मूलभूत सेवा व सुविधाची खात्री करुन देणे तसेच समुदायस्तरावर आरोग्य संवर्धनास मदत करणे, या अंबधीत निधीतून खर्चास प्राधान्य देणारी दोन स्तंभे आहेत. या मुलभूत तत्वांचे पालन करुन स्थानिक गरजा व प्राधान्यक्रम ठरवून त्यावर आधारित खर्च होणे अपेक्षित आहे.

४. अबंधीत निधी हा आपात्कालीन परिस्थितीत सर्व सामान्यांच्या हितासाठी वापरला गेला पाहिजे, तो व्यक्तीगत गरजासाठी नाही.

५. आपात्कालीन परिस्थितीत संदर्भ आणि वाहतुकीच्या बाबी वगळता केवळ निराधार महिलेस त्वरित आरोग्य सेवा देणे आवश्यक असल्यास (गरीब, वयोवृद्ध, दिव्यांग) यांचे करिता तातडीच्या आरोग्य सेवेसाठी आपात्कालीन परिस्थितीत (रु. ५००/- पर्यंत) इतका निधी वापरता येईल.

६. जन आरोग्य समितीने अशा गरजा पुर्ण करणेसाठी स्थानिक समुदायामार्फत संसाधने स्विकारणे, योगदान दिलेल्या व्यक्ती/संस्थांची नोंद घेऊन आरोग्य विषयक प्रोत्साहन दिन व वार्षिक जनसंवादाच्या दिनी अथवा सामाजिक उत्तरदायीत्व कार्यक्रमाच्या दिवशी त्यांचा सत्कार/सन्मान करता येईल.

७. नियमित पुरवठयामध्ये खंड पडल्यास अथवा तातडीच्या गरजा भागविणेसाठी तसेच संस्था देखभाल/ औषधी/ वैद्यकिय उपकरणे/ साहित्ये इ.खरेदीसाठी अबंधीत निधीचा वापर करता येईल.

८. खरेदी करण्यात आलेल्या औषधी/ वैद्यकिय उपकरणे/ साहित्ये ही राज्य शासनाने प्रसिध्द केलेल्या मुळ अत्यावश्यक यादीतील एक भाग असणे आवश्यक आहे.

## १०) अबंधित निधीतून खर्च करावयाच्या बाबी:-

१. मनुष्यबळाच्या खर्चाव्यतिरिक्त आयुष्मान आरोग्य मंदिर केंद्राचा परिसर स्वच्छतेसाठी लागणा-या उपयोग्य वस्तूंशी संबंधित खर्च. (झाडु, खराटा, टिकाव, पाटी)

२. प्रसाधनगृहातील स्वच्छ वातावरण निर्मितीसाठी खर्च.(फिनेल,ब्लिचिंग पावडर, हँडवॉश ) इ.

३. सेप्टिक टाक्या / शौचालयांच्या किरकोळ दुरुस्तीशी संबंधित खर्च.

४. रूग्णांना शुद्ध पिण्याच्या पाण्याची तरतूद करण्याशी संबंधित खर्च.

५. दिशादर्शक फलके/चिन्हाशी संबंधित खर्च.

६. कच-याच्या योग्य विल्हेवाटीच्या व्यवस्थापनाशी संबंधित खर्च.

७. आरोग्यविषयक प्रोत्साहन दिवस आणि लोक कल्याणकारी उपक्रम (उपकरणे खरेदी वगळता) आयोजित करण्याच्या संबंधित खर्च.

**११) अबंधित निधीतून खर्च न करावयाच्या बाबी:-**

१. नियमित देखभाल व दुरुस्ती करिता निधी अथवा अनुदान उपलब्ध आहे असा खर्च - (दुरध्वनी, विज व पाणी बिले इ.)

२. मनुष्यबळ/व्यक्तीगत खर्च. (वाहनचालक,प्रयोगशाळा तत्रंज्ञ,सफाई कामगार ई.)

३. अत्यावश्यक यादीत समाविष्ट नाहीत अशी - औषधे, निदानात्मक साहित्ये/वैद्यकिय उपकरणे ई.

४. शासनाच्या विविध कार्यक्रमाव्दारे तरतूद केली आहे अशी वस्तू किंवा उपक्रमे.

५. इमारतीचा मोकळा परिसर, बाहेरील व्यायामशाळा अथवा व्यायामाशी संबधीत उपकरणे/साधने अथवा बांधकाम इत्यादी.

**१२) अबंधित निधीचे आर्थिक व्यवस्थापन आणि लेखापरिक्षण:-**

१. जन आरोग्य समितीचे बँक बचत खाते हे दोन व्यक्तीच्या संयुक्त स्वाक्षरीने चालविणे बंधनकारक राहील. यासाठी नागरी प्राथमिक आरोग्य केंद्रात व नागरी आयुष्मान आरोग्य मंदिर केंद्रस्तरावर जन आरोग्य समितीचे नविन खाते उघडण्यात यावेत.
२. जन आरोग्य समितीच्या रचनेत अध्यक्ष पद हे महानगरपालीका, नगरपालीका व कटकमंडळ स्तरावरील AAM-UPHC / AAM-UHWC कार्यक्षेत्रातील प्रतिनिधित्व करणारे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे वॉर्ड सदस्य / नगरसेवक हे आहेत तर सदस्य सचिव म्हणून आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्रातील (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रातील (AAM-UHWC) वैद्यकिय अधिकारी कार्यरत राहतील. तथापि, सदर समितीच्या बँक खात्यातील व्यवहार हे आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्रातील (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रातील (AAM-UHWC) जन आरोग्य समितीचे सह अध्यक्ष व सदस्य सचिव यांच्या संयुक्त स्वाक्षरीने चालविणे बंधनकारक राहील .
३. बँक खात्यातुन कोणत्याही परिस्थितीत रोख रक्कम काढण्यात येऊ नये तसेच रोख स्वरुपात कोणतेही आर्थिक व्यवहार करण्यात येऊ नये.
४. जन आरोग्य समितीच्या प्रत्येक बैठकीत मागील महिन्याचा तपशीलवार खर्चाचा अहवाल सादर करुन समितीची मान्यता घेण्यात यावी.

५. जन आरोग्य समितीचे सह अध्यक्ष आणि सदस्य सचिव यांनी त्यांच्या संयुक्त स्वाक्षरीसह प्रत्येक महिन्याच्या खर्चाचे तक्ते आणि GFR १२-C नमुन्यात उपयोगिता प्रमाणपत्र (UC) वरिष्ठ कार्यालयात सादर करावयाचे आहे.

६. केंद्र शासनाने जारी केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार जन आरोग्य समित्यांचे दर तिमाहीला तसेच प्रत्येक आर्थिक वर्षअखेर वैधानिक लेखापरिक्षण होणे क्रमप्राप्त आहे. त्यामुळे अभियानांतर्गत होणा-या त्रैमासिक समवर्ती लेखापरीक्षणवेळी तसेच वैधानिक लेखापरीक्षण दरम्यान प्रत्येक संस्था प्रमुखाने आपल्या जन आरोग्य समिती अंतर्गत झालेल्या विनियोजनाचे लेखापरीक्षण न चुकता करुन घ्यावे.

७. अबंधित निधीतून हाती घेतलेल्या उपक्रमांचा आणि खर्चाचा वार्षिक अहवाल पुढील आर्थिक वर्षाच्या एप्रिल महिन्यात जन आरोग्य समितीच्या बैठकीत सादर करावयाचा आहे. हा वार्षिक अहवाल AAM-UPHC व AAM-UHWC च्या सामाजिक उत्तरदायित्वाचा एक भाग राहील.

८. समिती अंतर्गत संस्थास्तरावर होणारे सर्व खर्च / खरेदी /सेवा इत्यादी हे अभियानातंर्गत / राज्य शासन / केंद्र शासन स्तरावरुन वेळोवेळी निर्गमित झालेल्या मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करुनच केले जातील याची खबरदारी घ्यावी. शक्यतो सर्व खर्चाची अदायगी PFMS प्रणालीनुसार होण्यास प्राधान्य दयावे.

१३) <u>जन आरोग्य समितीचे अध्यक्षाची कार्ये, अधिकार व प्रमुख जबाबदा-या:-</u>

१. समितीच्या अध्यक्षांना सर्व बैठका आयोजनाचे व त्या बैठकीचे अध्यक्ष पद भुषविण्याचे अधिकार राहतील.

२. समितीच्या कार्याचे व प्रगतीचा आढावा घेणे तसेच सेवाविषयक प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने त्या संबधित प्रकरणाच्या चौकशीचे आदेश देण्याचा अधिकार राहील.

३. बैठकीचे सर्व वादग्रस्त प्रश्न मतदानाव्दारे सोडविणे व समिती सदस्यामध्ये एकसंगती नसल्यास निर्णायक मतदानाचा अधिकार समितीच्या अध्यक्षांना असेल.

४. तातडीच्या गरजा भागविणेसाठी अध्यक्ष हे सदस्य सचिवाच्या शिफारशीनुसार निर्णय घेऊ शकतात.

१४) <u>जन आरोग्य समिती सदस्य सचिवाचे कर्तव्य व जबाबदा-या:-</u>

१. जन आरोग्य समितीचे सदस्य सचिव हे समितीच्या सर्व बैठका, कार्यवाही आणि ठराव नोंदवून घेऊन त्यावर कार्यवाही सुनिश्चित करावी.

२. सदस्य सचिव दैंनदिन प्रशासनाचे व्यवस्थापन करीता समितीच्या वतीने पत्रव्यवहार करणे, सर्व व्यवहाराच्या नोंदी ठेवणे, व जंगम मालमत्ता ताब्यात ठेवण्याचा अधिकार असेल.

३. समितीच्या वतीने सर्व बीले, पावत्या, व्हाऊचर्स, करार आणि इतर महत्वाचे कागदपत्रावर स्वाक्षरी करण्याचे अधिकार असेल.

४. एखादया कार्यासाठी उपसमिती तयार करणे व त्या समितीला अधिकार सोपविणे.

५. निश्चित केलेल्या कार्यासाठी/उपक्रमासाठी आर्थिक तरतूदीचा प्रस्ताव पुढील बैठकीत सादर करुन मान्यता घेणे.

६. अध्यक्षाशी सल्ला मसलत करुन तातडीच्या बाबींवर कार्यवाही करुन निर्णय घेणे.

७. समितीच्या बैठकीत पर्यवेक्षकीय कर्मचा-यांना उपस्थित राहणे त्यांचे कामकाज समिती समोर सादर करण्याचे कार्य सदस्य सचिवांचे राहील.
८. आयुष्मान आरोग्य मंदिर केंद्रामध्ये सुविधा निश्चित केलेल्या गुणवत्ता विषयक मानके यांचा आढावा घेणे व त्यावर देखरेख ठेवणे.

१५) <u>जन आरोग्य समितीच्या अंमलबजावणीसाठी महत्वपुर्ण सुचनाः-</u>

१. दिनांक १४ एप्रिल हा दिवस आयुष्मान भारत आरोग्यवर्धिनी दिवस म्हणुन साजरा करणे.
२. आरोग्य केंद्रातील वर्षभरात आयोजित उपक्रम, त्यावरील यश, अपयश, आव्हाने व माहितीची देवाण घेवाण करीता समुदायस्तरावर दरवर्षी एक या प्रमाणे जनसंवादाचे आयोजन करणे यामध्ये एकत्रित केलेल्या त्रुटीच्या मुदयाविषयी चर्चा करुन सामोपचाराने प्रश्न निकाली काढणे, शक्य असल्यास वार्षिक नियोजन आराखडयामध्ये त्यांचा समावेश करणे.
३. विविध शासकिय योजनाविषयीची माहिती व त्यावरील हक्कविषयी जागरुकता वाढविणेसाठी रेडिओ, सोशल मिडिया यावर प्रचार व प्रसार करणे.
४. आरोग्य संस्थेच्या ठिकाणी नाविण्यपुर्ण योजनेवर भर देऊन उपक्रम यशस्वीरित्या पुर्ण करणे.
५. आपात्कालीन परिस्थितीत झालेल्या खर्चाची मान्यता पुढील बैठकीत प्रस्ताव सादर करुन कार्योत्तर मान्यता घेणे अनिवार्य आहे.

६. आयुष्मान भारत अंतर्गत आयुष्मान आरोग्य मंदिर येथे दिल्या जाणा-या सेवांचा प्रचार व प्रसार (Health Promotion) हे एक प्रमुख कार्य आहे. आरोग्य संवर्धन, जीवनशैली मधील बदल, आणि प्रतिबंधात्मक पध्दतीची योग्य प्रक्रिया सुरु करणे व त्यास चालना देणे.
७. अबंधीत निधीतून अनुज्ञेय असलेल्या खर्चाच्या विविध बाबींमध्ये इष्टतम नियंत्रण राखले गेले पाहिजे. जसे की, अ) आयुष्मान आरोग्य मंदिर परिसराची देखभाल ब) रुग्णसुविधा क) आयुष्मान आरोग्य मंदिराच्या पायाभूत सुविधाची देखभाल. अशा प्रत्येक श्रेणीमध्ये कमाल २०% खर्चाची मर्यादा निश्चित करण्यात येत आहे.
८. समितीची मासिक बैठका रचनात्मक असावी. बैठकीचा अजेंडा एकसुत्री असावा, आवश्यकता भासल्यास अध्यक्ष हे सदस्य सचिवासोबत विषयसुचीवर चर्चा करतील.
९. समितीच्या मासिक बैठकीत आरोग्य केंद्राच्या प्रगतीचा आढावा, वार्षिक नियोजन, प्रशासकिय बाबी यावर चर्चा करतील.
१०. जन आरोग्य समितीच्या मासिक बैठकीचे आयोजन करण्यासाठी जास्तीत जास्त रु. ४००/- (चहा/नाश्ता/ इतिवृत्त छायांकन करणे ) पर्यंत प्रती बैठक खर्च करता येईल.
११. आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी प्राथमिक आरोग्य केंद्रातील (AAM-UPHC) व आयुष्मान आरोग्य मंदिर नागरी आरोग्य केंद्रातील (AAM-UHWC) बँक खात्याचा व्यवहार सहअध्यक्ष व सदस्य सचिव यांच्या संयुक्त स्वाक्षरीने चालविण्यात येईल .
१२. सर्व देयके ही चेक/ डिमांड ड्राफ्ट/ नेट बँकिंग/ डिजीटल बँकिंग याव्दारे रक्कम अदा करता येईल शक्यतो सर्व अदायगी PFMS प्रणालीव्दारे करण्यास प्राधान्य दयावे.
१३. तातडीच्या प्रसंगी घेतलेल्या निर्णयाची मंजुरी समितीच्या पुढील बैठकीत सादर करुन कार्योत्तर मान्यता घ्यावी.
१४. प्रत्येक सभेच्या कामकाजाचे इतिवृत्त सभा संपुष्टात आल्यानंतर शक्य तितक्या लवकर समिती सदस्यांना सादर करणे अनिवार्य राहील.

१५. सदस्य सचिवांनी समितीच्या बैठकाशी संबंधित नोंदी, भौतिक व आर्थिक बाबीच्या नोंदी, दस्ताऐवजाचे दप्तरी जतन करणे आवश्यक आहे.

जन आरोग्य समिती हि जिल्हा एकात्मीक आरोग्य व कुंटूब कल्याण सोसायटी / शहरी एकात्मीक आरोग्य व कुंटूब कल्याण सोसायटीचा एक घटक म्हणून काम करेल. त्यासाठी कोणत्याही कार्यालयाकडे नोंदणी करण्याची आवश्यकता राहणार नाही.

१६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१८१२२४१३३७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA
VITTHAL
KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2025.02.18 12:25:08 +05'30'

**( राजेंद्र वि. कुडले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१.मा. सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई
२.मा. प्रधान सचिव, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३.मा.आयुक्त तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
४.मा.आयुक्त (सर्व महानगरपालिका)
५.जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, सर्व
६.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
७.उपसंचालक, आरोग्य सेवा, परिमंडळ, सर्व
८.मुख्यधिकारी, सर्व नगरपरिषद
९.वैदयकिय आरोग्य अधिकारी, सर्व महानगरपालिका
१०.जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
११.सभापती, महानगरपालिका व नगरपरिषदा सर्व
१२.आरोग्य सभापती, महानगरपालिका व नगरपरिषदा सर्व
१३.महिला व बाल कल्याण सभापती, महानगरपालिका व नगरपरिषदा, सर्व